महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासकीय परिपत्रक क्रमांक टिपीएस-३६९५/५०५/नवि-११,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,

दिनांक :- २ जून १९९५

परिपत्रक

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३१ अनुसार शासनाने विकास योजनेस मंजूरी दिल्यानंतर योजना अंमलात आल्यावर मंजूर विकास योजनेची अंमलबजावणी मंजूर योजनेप्रमाणे करणे नियोजन प्राधिकरणाचे कर्तव्य आहे. विकास योजना प्रस्तावात बदल करावयाचा झाल्यास अशा बदलास अधिनियमाच्या कलम ३७ मधील तरतुदीनुसार शासनाची मंजूरी करून घेणे आवश्यक आहे व अशी कार्यवाही न केल्यास सदर बाब कायद्याच्या अनुषंगाने योग्य होणार नाही.

शासनाच्या असे निर्दशनास आले की, महापालिका/ नगरपालिका, शासनाच्या अगर इतर योजना राबवितांना विकास योजना प्रस्तावाची दखल घेत नाहीत यामुळे विकास योजना प्रस्तावात सुसुत्रता व सलगता रहात नाही. शिवाय सदर बाब कायद्याच्या अनुषंगाने योग्य नाही.

याबाबत आदेश देण्यांत येत आहेत की, महापालिका/ नगरपालिका क्षेत्रात शासनाच्या अगर इतर योजना राबवितांना विकास योजना प्रस्तावाची दखल घेणे आवश्यक आहे. सदर योजनांमुळे विकास योजना प्रस्तावात बदल करावा लागणार असल्यास अशी दुरूस्ती विकास आराखड्यांत अधिनियमातील तरतुदीनुसार करून त्यास प्रथम शासनाची मंजूरी घ्यावी.

(स्वाक्षरी)
अ. म. अभ्यंकर
कार्यासन अधिकारी

प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी.

१] महापालिका आयुक्त, बृहन्मुंबई महापालिका, मुंबई,
२] व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ [ सिडको ], मुंबई.
३] महानगरपालिका आयुक्त [ सर्व ],
४] मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा.
५] संचालक, नगररचना , महाराष्ट्र राज्य, पुणे त्यांना विनंती करण्यांत येत आहे की, त्यांनी या परिपत्रकाच्या प्रती शाखा कार्यालयाकडे पाठवाव्यात.
६] उपसंचालक, नगररचना, बृहन्मुंबई२ कोकण विभाग/नाशिक विभाग/पुणे विभाग/ औरंगाबाद विभाग/अमरावती विभाग/ नागपूर विभाग,
७] नगर विकास विभाग, मंत्रालय, नवि-९, नवि-१२, नवि-१३,
८] नगर विकास विभाग/नवि-११, निवडनस्ती.